**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांक आरटीएस-२०१७/प्र.क्र.६४/कार्या-१८(र.व .का.)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मुंबई ४०० ०३२

दिनांक ३ एप्रिल, २०१७

<u>संदर्भ</u> : १) महाराष्ट्र शासन महसूल व वन विभाग आदेश क्र.डीपीटी- २०१७/०१/प्र.क्र.०३/ई, दिनांक ३०.३.२०१७

२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे आदेश क्र.२०१७/मशाका १/आस्था रा/प्रक्र.०९/ दिनांक ३०.३.२०१७

## <u>कार्यालयीन आदेश</u>

महाराष्ट्र राज्यात पारदर्शक, कार्यक्षम व समायोचित लोकसेवा देण्याकरिता आणि पात्र व्यक्तिंना लोकसेवा देणाऱ्या शासकीय विभागामध्ये व अभिकरणांमध्ये आणि इतर सार्वजनिक प्राधिकरणांमध्ये पारदर्शकता व उत्तरदायित्व आणण्यासाठी “महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५” हा अधिनियम दिनांक २८ एप्रिल, २०१५ पासून अंमलात आला आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक. संकिर्ण २०१५/ प्र.क्र. ४५/१८ (र. व का.) दिनांक १७ जून, २०१६ अन्वये, मुंबई शहर जिल्हा व मुंबई उपनगर जिल्हा यासाठी “ राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त “ तसेच प्रत्येक महसुली विभागाकरिता एक “राज्य सेवा हक्क आयुक्त “ व त्यांच्या कार्यालयांसाठी अधिकारी / कर्मचारीवृंद अशा एकूण १४२ पदांची निर्मिती करण्यात आली आहे. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय तात्पुरत्या स्वरुपात निर्मल इमारत, २ रा मजला,नरीमन पॉईंट, मुंबई येथे स्थापन करण्यात आले आहे.

३. संदर्भाधीन एक अन्वये श्री.संजय काटकर, अपर जिल्हाधिकारी यांची उपसचिव, राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने प्रथमत: एक वर्षाच्या कालावधीसाठी पदस्थापना करण्यात आलेली आहे.

४. संदर्भाधीन क्र.२ अन्वये त्यांना विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद यांनी दिनांक ३१.३.२०१७ रोजी (म.नं.) कार्यमुक्त केलेले असून, ते दिनांक ३.४.२०१७ रोजी (म.पू.) अपर मुख्य सचिव (प्र.सु.व र.व का.) यांचे कार्यालयात रुजू झालेले आहेत. त्यांच्या सेवा या आदेशान्वये दि. ३.०४.२०१७ (म. पू.) पासून राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, मुंबई यांच्या कार्यालयात वर्ग करण्यात येत आहेत. त्यांनी तात्काळ त्या कार्यालयात रुजू व्हावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४०६११४०५५६६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d06148 3d7d35e20f744e251360f7920a, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2017.04.06 11:42:02 +05'30'

**( संतोष वि.रोकडे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्री.संजय काटकर, अपर जिल्हाधिकारी

माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-

१) अपर मुख्य सचिव (प्र.सु.व र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

२) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रलाय, मुंबई ४०० ०३२
३) प्रधान सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद
५) सह / उपसचिव (कार्या-१४ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
६) सह / उपसचिव (रवका), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
७) निवडनस्ती (कार्या-१८र.व का.)